राज्यातील संकटग्रस्त महिलांना तातडीने आवश्यक माहिती व सहाय्य मिळण्यासाठी “१८१ महिला हेल्पलाईन” या घटक योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मिसंहे २०२३/प्र.क्र.१९/कार्या-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३ मे, २०२३.

वाचा : १) सह सचिव, केंद्रीय महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अ.शा.पत्र क्र.WW-२३/१/२०२१-WW Dated: १४th July, २०२२.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.३०७/का.२, दि.०३.०१.२०२३
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.९७/का.२, दि.१२.०१.२०२३

**प्रस्तावना:-**

केंद्र शासन पुरस्कृत “मिशन शक्ती” या योजनेच्या केंद्र शासनाने दिनांक १४ जुलै, २०२२ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना शासन परिपत्रक दि.०३.०१.२०२३ अन्वये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षापासून राज्यात लागू करण्यात आल्या आहेत. राज्यातील संकटग्रस्त महिलांना तातडीने आवश्यक माहिती व सहाय्य मिळण्यासाठी “१८१ महिला हेल्पलाईन” ही टोल फ्री हेल्पलाईन सुरु करण्याबाबतचा शासन निर्णय दि.१२.०१.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या “मिशन शक्ती” योजनेंतर्गत “१८१ महिला हेल्पलाईन” या घटक योजनेसाठी केंद्र शासनामार्फत १००% निधी देण्यात येणार आहे. सदर निधी अर्थसंकल्पीत करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील संकटग्रस्त महिलांना तातडीने आवश्यक माहिती व सहाय्य मिळण्यासाठी “१८१ महिला हेल्पलाईन” या घटक योजनेसाठी निधी अर्थसंकल्पीत करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| **केंद्र हिस्सा (१००%)** | | |
|---|---|---|
| **मागणी क्र.** | **एक्स-१** | **X-1** |
| प्रधान लेखाशिर्ष | २२३५ -सामाजिक सुरक्षा व कल्याण | 2235–Social Security and Welfare |
| उप प्रधान लेखाशिर्ष | ०२, समाज कल्याण | 02， Social Welfare |
| गौण शिर्ष | १०३, महिला कल्याण | 103， Women Welfare |
| गट शिर्ष | (३१), मिशन शक्ती या एकछत्री योजनेंतर्गत “संबल” उपयोजना | (31)， “Sambal” sub-scheme under Umbrella Mission Shakti Scheme |
| उपगट शिर्ष | (३१)(०१), राज्यातील संकटग्रस्त महिलांना तातडीने आवश्यक माहिती व सहाय्य मिळण्यासाठी टोल फ्री “१८१ महिला हेल्पलाईन”<br>(केंद्र हिस्सा १००%)<br>(२२३५ डी३८२) | (31)(01)， Toll free “181 Women’s Helpline” to provide urgent information and assistance to distressed women in the state (Central Share 100%)<br>(2235 D382) |

२.	सदर योजनेवरील खर्चासाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, लेखाधिकारी, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

३.	सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१/का.१४११, दि.२९.०३.२०२३, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४३/व्यय-६, दि.२५.०४.२०२३ तसेच, प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी), मुंबई कार्यासयाने संदर्भ क्र.१८९/२०२२-२३/१०८०, दि.१७.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५०३१६५२४६६६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI P KARWAR

Digitally signed by SHIVAJI P KARWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=579FDC49AAE09A107A14D18D2E6E7AEC6E608DE79CB8407CA0E64638BB98CDB0, cn=SHIVAJI P KARWAR
Date: 2023.05.03 17:01:52 +05'30'

**( शि. पां. कारवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/सदस्य, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.मंत्री सर्व यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३.आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई,
१४.आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,
१५.सर्व जिल्हाधिकारी,
१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१७. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१९.उपायुक्त (महिला विकास/(बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२०.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
२१.सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास,
२२.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
२३. सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.निवड नस्ती, कार्यासन-२.